GR-200408271624330001-0100

शासकीय सेवेत असतांना बेपत्ता झालेल्या/ दिवंगत झालेल्या किंवा क्षयरोग, कर्करोग इत्यादी गंभीर आजारामुळे मुदतपूर्व सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचा-यांच्या नातेवाईकास नेमणुक देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक अकंपा-१०८८/९१२/प्र.क्र. १६९/८,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक ६ ऑक्टोबर, १९८९.

पहा :-[१] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०७९/ सीआर-२४३/१३-अ, दिनांक ५ ऑक्टोबर, १९७९.

[२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अकंपा-१०८४/१८९/ सीआर-१५५/१३-अ, दिनांक ८ मार्च, १९८५.

## शासन निर्णय

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-अकंपा-१०८४/१८९/सीआर-१५५/१३-अ, दिनांक ८ मार्च, १९८५ अनुसार शासकीय सेवेत असतांना दिवंगत झालेल्या किंवा क्षय/कर्क रोग इत्यादी गंभीर आजारामुळे मुदतपूर्व सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचा-यांच्या नातेवाईकांना नेमणुक देण्याबाबत सविस्तर आदेश काढण्यात आलेले होते. सदर आदेशातील काही त्रुटी सुधारण्याचा तसेच आर्थिक मर्यादाही सुधारण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत काळजीपूर्वक विचार करुन शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

१. दिनांक ८ मार्च, १९८५ च्या शासन निर्णयाच्या जोडपत्रातील नियम २ खालील [ड] नंतर खालील तरतुदीचा समावेश करण्यात यावा :-

[इ] शासकीय सेवेत असतांना बेपत्ता झालेला कर्मचारी

[एक] शासकीय कर्मचारी बेपत्ता झाल्यापासून सहा महिन्यानंतर अथवा पाच वर्षाच्या आत त्याच्या कुटुंबियाने अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठी अर्ज करणे आवश्यक राहील.

[दोन] बेपत्ता कर्मचारी हजर झाल्यास सेवेत नियुक्त केलेल्या कुटुंबियास कमी करण्यात येईल.

[तीन] दिनांक ८ मार्च, १९८५ च्या आदेशातील नियुक्तीकरिता विहित केलेल्या शिक्षण, वय, उत्पन्न इत्यादी सर्व अटी या नियुक्तीलाही लागू असतील.

२. दिनांक ८ मार्च, १९८५ च्या आदेशाच्या जोडपत्रातील नियम ३[अ] पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात यावा :-

नियम ३[अ] : बेपत्ता/अकाली सेवानिवृत्त/दिवंगत शासकीय कर्मचा-यांची पत्नी/ पती, मुलगे, अविवाहीत मुली तसेच शासकीय कर्मचा-याने त्याच्या बेपत्ता होण्यापूर्वी/

अकाली सेवानिवृत्त होण्यापूर्वी/मृत्यूपूर्वी त्याने कायदेशीररित्या दत्तक घेतलेला मुलगा/अविवाहीत मुलगी ही या नियमानुसार नेमणुकीस पात्र नातेवाईक मानण्यात येतील. त्यापैकी कोणीही व्यक्ती नेमणुक स्वीकारु शकत नसेल तर सदर कर्मचा-यावर अवलंबून असणारा अविवाहीत भाऊ अथवा अविवाहित बहीण यांचा नेमणुकीसाठी विचार करता येईल.

३. दिनांक ८ मार्च, १९८५ च्या आदेशाच्या जोडपत्रातील नियम [४] [अ][३] खालील प्रमाणे सुधारित करण्यात येत आहे :-

नियम [४][अ][३] : अनुकंपा तत्वावर संबंधित नातलगाची शैक्षणिक पात्रता व वय यानुसार राज्य शासनांतर्गत कोणत्याही निम्न-स्तरावरील तृतीय तसेच चतुर्थ श्रेणीच्या सरळसेवा प्रवेशाने भरल्या जाणा-या पदावर नियुक्ती करता येईल. मात्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पोलीस उपनिरीक्षक, विक्रीकर निरीक्षक, मोटारवाहन उपनिरीक्षक, वन क्षेत्रपाल इत्यादी तृतीय श्रेणीच्या कार्यकारी [एक्झिक्युटीव्ह] पदांवर नियुक्ती देता येणार नाही. ह्या नियमांनुसार नियुक्ती मिळण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या स्पर्धा परीक्षेस बसण्याची आवश्यकता नाही. तसेच वरील नियमानुसार सदर पदांवर नेमणूक करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सल्ला घेण्याची आवश्यकता नाही.

४. दिनांक ८ मार्च, १९८५ च्या आदेशाच्या जोडपत्रातील नियम [५] [ब][६] पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे :-

नियम [५][ब][६]: दिवंगत/अकाली सेवानिवृत्त/बेपत्ता कर्मचारी ज्या कार्यालयात काम करीत होता, त्या कार्यालयातील संबंधित नियुक्ती प्राधिकारी या नियमानुसार नेमणूक देण्यास सक्षम राहील. त्यासाठी त्याने महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सल्ला घेणे आवश्यक नाही. मात्र नातेवाईकाने सदर प्राधिका-याकडे उपरिनिर्दिष्ट मुदतीत नेमणुकीसाठी अर्ज करणे आवश्यक राहील.

५. दिनांक ८ मार्च १९८५ च्या जोडपत्रातील नियम ७ पुढीलप्रमाणे सुधारण्यात येत आहे :-

नियम ७ : खालील परिस्थितीत बेपत्ता/अकाली सेवानिवृत्त/दिवंगत कर्मचा-याचा कोणीही नातेवाईक या नियमातील तरतुदीनुसार नोकरीस पात्र राहणार नाही.

[अ] संबंधित दिवंगत/अकाली सेवानिवृत्त कर्मचा-याच्या कुटुंबियास खालील योजनेनुसार मिळणारी एकूण रक्कम रु. १,५०,०००/-[रुपये एक लक्ष पन्नास हजार] पेक्षा जास्त असल्यास —

[एक] कर्मचारी गट विमा योजना

[दोन] भविष्य निर्वाह निधीतील बचत आणि ठेव संलग्न विमा योजनेद्वारे मिळणारी रक्कम.

[तीन] मृत्यु-नि-सेवानिवृत्ती उपदान.

किंवा

[ब] संबंधित दिवंगत/अकाली सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या कुटुंबियास अकाली सेवानिवृत्तीच्या/मृत्यूच्या दिवशी निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतन व स्थावर मालमत्तेच्या उत्पन्नासह सर्व मार्गांनी मिळणारे एकूण मासिक उत्पन्न रु. १,२००/- अधिक रु. १,२००/- इतके निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनावर सदर दिवशी मिळणारी महागाई वाढ यापेक्षा जास्त असल्यास.

टीप १ :- सरकारी कर्ज, सहकारी संस्था, बँका इत्यादींचे देणे यांसारखी वैयक्तिक देणी यापुढे संबंधित दिवंगत/अकाली सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या कुटुंबास मिळणा-या एकूण रु. १,५०,०००/- या रकमेतून वजा करता येणार नाहीत.

टीप २ :- कुटुंब या संज्ञेमध्ये बेपत्ता/अकाली सेवानिवृत्त/दिवंगत कर्मचा-याची पत्नी/पती, मुलगे, अविवाहित मुली तसेच शासकीय कर्मचा-याच्या बेपत्ता होण्यापूर्वी/अकाली सेवा-निवृत्तपूर्वी/मृत्युपूर्वी कायदेशीररित्या दत्तक घेतलेला मुलगा/अविवाहित मुलगी व त्यांचेवर अवलंबून असणारा अविवाहित भाऊ, अविवाहित बहिणी यांचा समावेश होतो.

६. दिनांक ८ मार्च, १९८५ च्या जोडपत्रातील नियम ८[ब] पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे :-

नियम ८ [ब] : वरील नियम ४[अ] मध्ये काहीही असले तरी वरील नियम ८[अ] मधील तरतुदींद्वारे नियमांचे शिथिलीकरण करून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील वर्ग ३ च्या पदावर एखाद्या व्यक्तीची नियुक्ती करण्यापूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सल्ला घेतला पाहिजे आणि असा सल्ला घेण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाची पूर्वसंमती घेतली पाहिजे.

७. हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील. तथापि, जी प्रकरणे प्रलंबित आहेत, ती या आदेशानुसार निकाली काढण्यात यावीत.

८. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-पीएसएफ-५३०८/ दिनांक १६ ऑगस्ट १९८९ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

भा. म. भणगे
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई ४०० ०३५,